# नेटाक्षरीच्या सर्व वाचकांना ई-साहित्य परिवारातर्फे दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा. . . . . .!!!!!!

## — टीम ई-साहित्य

संपादक - शशिकांत रणवरे
मुखपृष्ठ - सोनाली घाटपांडे
मांडणी व सजावट - भारती सरमळकर, शशिकांत रणवरे

संपर्क: E Sahity Pratishthan
वेबसाईट: http://www.esahity.com/
ईमेल: esahity@gmail.com
मोबाईल: 9869674820
Eleventh Floor (G I 102)Eternity , Estern Express Highway
Thane. 400604.



## ----- जर-तर -----

तिच्या ठिगळ लावल्या पदराला
टीचभर सुखाची किनार असती.
तर आम्हीही शायर झालो असतो...
तिच्या सळसळत्या पदराची आणि
वाऱ्याची जुगलबंदी शब्दात मांडली असती.

तव्यावरती अंग शेकलेली भाकरीच्या
चंद्राची कोर झोपडीत उगवली असती.
तर आम्हीही चांदणं प्यालो असतो...
भरल्या पोटी चंद्राची मग
दृष्ट देखील काढली असती.

मुखवट्यांच्या दुनियेमध्ये
एका जरी चेहऱ्याची भेट झाली असती.
तर आम्हीही मुखवटा फेकून आलो असतो...
त्या एका चेहऱ्यासाठी,
लाखो मुखवट्यांची दुनिया झिडकारली असती.

नक्षत्रांची आभाळातली मक्तेदारी
जर संपवता आली असती.
तर आम्हीही मरणाला परतवून आलो असतो...
कपाळावर सटवाईने कोरलेली
भळभळती जखम भरून काढली असती.

दिवाळसणाला दारापाशी
एक जरी पणती तेवली असती.
तर आम्हीही आतून सूर्य झालो असतो...
प्रकाश भरल्या नजरेने मग
झोपडीतल्या अंधाराची सद्दी संपवली असती.

**संचिता कारखानीस**



## ------ चिल्लर -----

नक्षत्रांची अवखळ लगबग
ग्रहताऱ्यांची अबलख चाल
राहूकेतूला पडला आहे
उद्या काय चा कूट सवाल

सट्कन सटके स्प्रिंग शनीची
मंगळ भकतो मंत्र अमंगळ
शुक्र तडफ़डे ऐडमिशनला
गुरूच करतो टंगळमंगळ

भंकस चिंता नको उद्याची
कितीही म्हटले तरीही होते(च)
दिवस ढकलतो यं त्यंव करता
उत्तर रात्री गोची होते

तडक उठावे, चूल पेटवून
कुंडली खरपुस भाजून खावी
उपदेशाच्या डोसासोबत
अपमानाचे थुंक गिळावे

जो तो बच्चंम शिकवत सुटला
स्वतःस समजे बढकर बच्चन
जोवर आहे खिसा रिकामा
दुनियादारी सावध सज्जन

**नाम गुम जायेगा**



## ------ आठवा ------

चाळल्यानंतर उरे जो शेवटाला
मी कंकराहे तो कवितेतुन टाळलेला

राख उरते लाकडे वा कोळशाची
मी कर्पुराहे शेष नुरता जाळलेला

घरची करु इभ्रत°, म्हणे पण फसवलेला
तो पदराहे बाजारबसवा ढाळलेला

उध्वस्त देऊळ ना नवस,नैवेद्य काही
एक हार आहे प्रार्थनेसम वाळलेला

वाट पाहुन लालडोळे पाणी होता
दुनियेसमोरी हसणे नव्याने माळलेला

फ़ावल्यावेळी उगा येते हाती जे
पुस्तकाहे ना वाचता मी चाळलेला

.
.
.
.

(सात आहे अश्व सुर्याच्या रथाला
मी आठवा बस शौकेखातर पाळलेला)

**प्राजक्त देशमुख**

# ------- किसी दिन ------

किसी दिन..
काश ये नींद
न खुले किसी दिन

ना वो जुनूं होगा
न वो तडप होगी
न होगी कल की दहशत
...न इंतजार की आदत होगी
न तूम होंगे मासूम बेवफ़ा अनजान
ना ही आवारा फ़िज़ूल बदनाम हम होंगे
तेरी यादोंपे न कलम चलेगी हमारी
और ना ही तुमपे कोइ उंगली उठेगी
न मिसाले बनेंगी न कहानी
और ना ही बेबाक कोइ आसू बहेगा

सुना है ऐसे ही रुकसत होते है आशिक
शायरोकी कलमसे, किताबों के पन्नों में

आनंद माने





# ------ आयुष्यावरती -----

'आयुष्यावरती एखादी कविता लिहून बघ '

सूर्या समोर आला एक आभाळ वेडा ढग

म्हणाला " आयुष्यावरती एखादी कविता लिहून बघ "

तहान- भूक लागतेच सर्वांना पण सर्वांची भागतेच असं नाही

उपाशी पोटी झोपते रात्र पण रोज जागतेच असं नाही

म्हणून तहान - भुकेच्या पलीकड़े जाऊन बघ ...

गढूळ झालेलं डबकं प्रवाहासोबत  वाहू लागलयं

अस्तित्व हरवून आता  नुसतचं वाहत जाऊ लागलयं

त्याला अडव तिथेच त्यातलं थोडं पिऊन बघ ...

स्मशानातल्या झाडाखाली एका कवीची वही आहे

पाने मोकळी अस्ताव्यस्त तिची शिलाई उसवली आहे

शब्दांना सुई न टोचता घाल टाके वही शिवून बघ ...

**जयसिंग कांबळे**



# ----- उत्सव -----

.
.
उत्सव
उत्सवच होतास माझ्यासाठी तू
.
तुझं येणं, तुझ बोलणं, तुझ हसणं....
आणि तू
किती लगबग आणि किती गडबड व्हायची माझी
.
नुसता शेजारी बसलास ना तरी
दिवाळीच्या पहिल्या पहाटेच अभ्यंगस्नान अनुभवयाचे मी...
तुझ्या त्या घटिकाभर सहवासात
.
हसलास ना की जणूदारातील पणत्यांची माळ
अधिकच लक्ख व्हायची बघ
आणि नखशिखांत उजळून निघायचे मी त्यात
.
तुझा स्पर्श
मऊशार सारवलेल्या
ह्या काळजावर
असंख्य रांगोळ्या काढायचा
आणि मग
माझा एक हरवलेला रांगोळीचा ठिपका
नेमका तुझ्या त्या खळीत सापडायचा बघ....
उत्सव
उत्सवच होतास माझ्यासाठी तू
पण
अताशा दिवाळीला दुरुनच बघते मी
त्या उत्सवाला माझ्या "ह्या" उत्सवाची
थोडीच सर येणाराय...
अताशा दिवाळीला दुरुनच बघते मी

भारती सरमळकर

# ------ कितीक -----



कितीक तु, कितीक मी, कितीकशा अश्या कथा
कल कि शाम थी यही, अब आज 'शाम' लापता..॥

खोजता चला चलु, तो यह परछाई क्यो जले ?
तरी बरे...,तु ठेवलीस ही नभावरी निळी फ़ुले...॥

ए आठवते का रुसताना, तुझेही व्हायचे असे ?
तब जलती थी खामोशी, अब चलती भी दुरसे..॥

तभी से मुंतिजर सूर, इन बेलिबास शाखं पर
भर पाचोळा गुण-गुण दिलीस तू हाक जर...॥

तशी अजुन बांधीलच या वा-याला “ती” शपथ
तु मिले न भी मिले तो करे चांदसे दस्तखत...॥

तु नही तो ये आसमां तेरी ये शाम लिख चला
तुझ्याशिवाय लिहिणेही, अजुन चालते तुला?...॥

होती तनहाई सिंदुरी, उसकी भी क्या खता
कितीक तु, कितीक मी, कितीकशा अश्या कथा...॥

**सचिन काकडे**



# ------ दीवान ------

हिलते हुए पन्ने हैं .. खुलते हुए धागे हैं..
ये जिन्दगी हमारे दीवान सि लागे हैं..

पलकों के किनारे पे जो अश्क मुकम्मल हैं
आँखों से जो ढल जाए.. सैलाब ही आगे हैं

इक शक्स हैं जो खींचे .. कुछ साल और पीछे
इक उम्र हैं जो आगे... रफ़्तार से भागे हैं

वो बंद भी कर ले़ जो.. दिल के सभी दरीचे
हम खूब जानते हैं .. किस ओर सुरागे हैं

मीर-ओ-दाग-ओ-ग़ालिब अब शब्-अ-खैर कर लो
हम आप के करम से .. हर रात के जागे हैं

बे-दाद क्यूँ न रहते .. लिख्खे जो अशार हम ने
कुछ वक़्त से पहेले थे.. कुछ वक़्त के आगे हैं...

**समीर सामंत**

# -------- स्वप्न -------



असेच वाटले होते त्याला.... की... ती त्याची होती....
खळखळणा-या हास्य लकेरी...संथ तळ्याच्या काठी

फिरता बोटे जादूची ती.....सूर दिशांतून भरला
श्वास सावळा... पैंजणवेड्या पावलात घुटमळला

पाऊलतळीच्या गवताला ही....गंध मेहंदीचा आला
अंधाराला चंद्र ही...तेव्हा....तीट लावूनी गेला

क्षितिजावरच्या गाय सावल्या....जवळ जवळ येताना...
मिटले होते...डोळे त्याचे....तीचे स्वप्न बघताना

मोरपिसाला थरथर देतो.... भिरभिरता हा वारा...
वाट परतीची दाखवू लागे....लुकलुकणारा तारा....

उडता उडता एक वार्ता.... कुठून आली कानी...
शुभ्र घोडा उधळत आला....दूर वरुनी कोणी

मंगल वाद्ये घुमू लागली.....गुढ्या तोरणे सजली
मेघदूताने सांगितले की...." वयात आली बिजली "

भरून डोळे पहाण्यासाठी....वळून हळूच पाही....
" नजरे मधली प्रीत... तुला गं...कशी दिसली नाही ? "

' निळी ' आसवे बघता बघता....आपसूक मोती झाली...
बासरी मधला सूर हरवला....उठता तिची डोली

**मंदार चोळकर**

## नेटाक्षरीच अंक नियमीत मिळण्यासाठी सुचना अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता संपर्क :

# netaksharee@gmail

ई साहित्य प्रतिष्ठानचे आता जवळपास दिड लाख ई मेल सदस्य आहेत.

याशिवाय ई साहित्य प्रतिष्ठानच्या वेबसाईट्सचे वाचक वेगळेच. www.esahity.com च्या या आठवड्यात तीन लाख हिट्स पूर्ण झाल्या तर www.ednyaneshwari.com च्या पन्नास हजार. या शिवाय www.marathiriyasata.com ला तीस हजार हिट्स आहेत. या शिवाय ई साहित्यचे खालील ब्लॉग्स आणि पेजेस आहेत.

http://etyarth.blogspot.in/

http://esahityapratishthan.blogspot.in/

http://esahityapratishthan.blogspot.in/p/blog-page.html

फ़ेसबुकवर भेट द्या

https://www.facebook.com/esahity

https://www.facebook.com/groups/kaavya.marathi/

https://www.facebook.com/groups/gadyasansthan.esahity/

https://www.facebook.com/groups/kavyanjali.esahity/

https://www.facebook.com/groups/yadny/

https://www.facebook.com/groups/netaksharee/

https://www.facebook.com/edyaneshwari

https://www.facebook.com/balnetakshari

## सर्व ई-पुस्तके विनामुल्य मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता संपर्क :

# esahity@gmail.com